**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**क्रमांकः उसप्र १३२५/प्र.क्र.५९/प्रशा-१**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक: ३० एप्रिल, २०२५.

## आदेश

श्रीमती जयरेखा मिलिंद निकुंभ, उप सचिव यांची संचालक, नाशिक विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक या पदावरील प्रतिनियुक्ती संपुष्टात आणून त्यांची उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग यांच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक कार्यालयातील महाव्यवस्थापक (प्रशासन) या पदावर खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रथमत: ३ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) श्रीमती निकुंभ, उप सचिव ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला ते आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील, त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-२) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती विचारात घेऊन, श्रीमती निकुंभ, उप सचिव यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग आणि आदिवासी विकास विभाग यांनी आपापसात सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

३. श्रीमती जयरेखा निकुंभ, उप सचिव यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागामार्फत हाताळण्यात येतील.

४. श्रीमती जयरेखा निकुंभ, उप सचिव यांना आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक कार्यालयातील महाव्यवस्थापक (प्रशासन) या पदावर रुजू होण्यासाठी नाशिक विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था नाशिक यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांनी श्रीमती जयरेखा निकुंभ, उप सचिव यांना तात्काळ रुजू करुन घ्यावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४३०१८४३०६५९०७ हा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.04.30 18:44:05 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अ.मु.स/प्र.स., मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अ.मु.स/प्र.स./सचिव, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अ.मु.स/प्र.स./सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ,नाशिक.
७. संचालक, नाशिक विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक.
८. सह/उप सचिव (आस्थापना), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग/आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. श्रीमती जयरेखा निकुंभ, संचालक, नाशिक विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक.
१०. निवडनस्ती प्रशा-१.